सोलापूर उर्दू घराच्या इमारतीसाठी महापालिकेकडून आकारणात आलेली कराची रक्कम वितरित करणेबाबत

# महाराष्ट्रशासन
## अल्पसंख्याक विकास विभाग
## शासननिर्णयक्रमांकः सोऊघ २०१४/प्र.क्र.६० (भाग-१)/का.४

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: २९.०३.२०२५

**वाचा-**

१) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्रमांक सोऊघ २०१४/प्र.क्र.६०/का.४, दि.०२.०५.२०१७.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक:अर्थसं- २०२४/प्रक्र. ३४/अर्थ-३, दि.१ एप्रिल, २०२४
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक:अर्थसं- २०२४/प्रक्र. ८०/अर्थ-३, दि.२५ जुलै, २०२४
४) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांक उघव्य-२०१६/प्र.क्र.१९/कार्या-४, दि.२१ जुलै, २०१६.
५) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक:अर्थसं- २०२४/प्र.क्र. ८०/अर्थ-३, दि.१७ मार्च, २०२५
६) उपाध्यक्ष,-उर्दू घर सांस्कृतिक समिती तथा उपविभागीय अधिकारी, सोलापूर क्रमांक १, सोलापूर यांचे पत्र क्रमांकः २०२४/उविअक्र.१/एमएजी/कावि/१८१/२०२४, दि.२९.०१.२०२५.

**प्रस्तावना-**

संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णय दि.०२.०५.२०१७ अन्वये सोलापूर शहरातील सर्वे नं.६१७२ मधील २२७४.४२ चौ.मी. भूखंडावर उर्दू घर उभारण्यात आले आहे. उपाध्यक्ष,-उर्दू घर सांस्कृतिक समिती तथा उपविभागीय अधिकारी, सोलापूर क्रमांक १, सोलापूर यांनी दि.१५.०२.२०२४ रोजी सदर उर्दू घराचा ताबा घेतलेला आहे. उपाध्यक्ष,-उर्दू घर सांस्कृतिक समिती तथा उपविभागीय अधिकारी, सोलापूर यांनी त्यांच्या संदर्भ क्र.६ येथील पत्रान्वये, सोलापूर उर्दू घराच्या इमारतीसाठी महापालिकेकडून आकारणात आलेली कराची रक्कम वितरित करण्यासाठी मागणी सादर केली आहे. त्यास अनुसरुन सदर प्रयोजनासाठी अनुदान वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती .

**शासन निर्णय-**

उपाध्यक्ष,-उर्दू घर सांस्कृतिक समिती तथा उपविभागीय अधिकारी, सोलापूर यांनी त्यांच्या संदर्भ क्र.५ येथील पत्रान्वये मागणी केल्यानुसार, सोलापूर उर्दू घराच्या इमारतीसाठी महापालिकेकडून आकारणात आलेली कराच्या रकमेपोटी रु.८,७१,१८९/-(रुपये आठ लाख एक्काहत्तर हजार एकशे एकोणनव्वद मात्र) इतका निधी जिल्हाधिकारी, सोलापूर यांना वितरित करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. तसेच जिल्हाधिकारी, सोलापूर यांना वितरित करण्यात आलेला निधी उपाध्यक्ष,-उर्दू घर सांस्कृतिक समिती तथा उपविभागीय अधिकारी, सोलापूर क्रमांक १ यांना वितरित करण्यास याद्वारे मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. जिल्हाधिकारी, सोलापूर यांनी सदर निधीच्या विनियोगाबाबतचा ताळमेळ करुन विहित नमून्यात उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तसेच महालेखाकार कार्यालयास सादर करावे. जिल्हाधिकारी, सोलापूर यांनी सदर खर्च विहित मर्यादेत राहील याची दक्षता घ्यावी

३. वरीलप्रमाणे अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी तसेच खर्च करतांना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पिय नियम पुस्तिकेतील तरतूदी व सर्व अटी/शर्तीचे पालन करणे ही जबाबदारी जिल्हाधिकारी, सोलापूर यांची राहील.

४. सदर प्रयोजनासाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडई-१ २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण - २००-इतर कार्यक्रम-राज्य योजनांतर्गत योजना- (००)-(००)(१८) - उर्दू घरासाठी सहाय्यक अनुदाने (२२३५ ए ५५२) ३१, सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, वित्त अधिकार नियम शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांकः विअप्र-२०१५/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम (भाग-२), दि. १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियमपुस्तिका,१९७८ उपविभाग दोन अ.क्र.३० (१) नियम क्र.२ व ७ आणि नियोजन विभाग अनौ. संदर्भ क्र.१२८/१४७१, दि.२७.०२.२०२५ आणि वित्त विभाग अनौ.संदर्भ क्रमांक ८९/ २०२५/ व्यय-१ दि.१८.०३.२०२५ अन्वये प्राप्त मान्यता तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक:अर्थसं- २०२४/ प्रक्र. ३४/ अर्थ-३ , दि.१ एप्रिल, २०२४ आणि शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक:अर्थसं- २०२४/ प्रक्र. ८०/ अर्थ-३, दि.२५ जुलै, २०२४ तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक:अर्थसं- २०२४/प्र.क्र. ८०/ अर्थ-३, दि.१७ मार्च, २०२५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्राप्त अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२९१५१९०६१७१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by MILIND PADMANABH SHENOY
Date: 2025.03.29 15:19:54 +05'30'

**( मिलिंद शेणॉय )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल-१/२ ( लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
२. सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक,
३. जिल्हाधिकारी, सोलापूर,
४. सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक,
५. उपाध्यक्ष,-उर्दू घर सांस्कृतिक समिती तथा उपविभागीय अधिकारी, सोलापूर क्रमांक १, सोलापूर
६. जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर,
७. कक्ष अधिकारी/अर्थ (का-७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. वित्त विभाग (व्यय-१/अर्थ-१४) / नियोजन विभाग (१४७१), मंत्रालय, मुंबई,
९. निवडनस्ती (का-४)/कार्यासन-४, संग्रहार्थ.